**स्त्री रुग्णालय धडगाव, जि. नंदूरबार येथील अस्थायी पदे पुढे चालु ठेवणेबाबत.**

# महाराष्ट्र शासन

## सार्वजनिक आरोग्य विभाग

**शासन निर्णय क्रमांक:- पीएचडी १६०२७/८५/२०२५ पीएचडी (आरोग्य-३) (ई.कॉम्प्युटर नं.१०७९०५४)**

१० वा मजला, गोकुळदास तेजपाल रुग्णालय संकुल इमारत,
लोकमान्य टिळक रुग्णालय, मंत्रालय, मुंबई-४०० ००१.
दिनांक:- २८ एप्रिल, २०२५.

<u>वाचा:-</u>

**१) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्र. पदनि-२०२२/प्र.क्र-१०/आरोग्य-३अ, दि. २३.०९.२०२२**

**२) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्र. अपदे-२०२४/प्र.क्र.१२४/आरोग्य-३, दि. २६.०९.२०२४**

**३) वित्त विभाग,शासन निर्णय क्र.पदनि-२०१६/प्र.क्र. ८/१६/आ.पु.क, दि.०३.०३.२०२५.**

**४) सहसंचालक (हिवताप, हत्तीरोग व जलजन्यरोग) यांचे पत्र क्रमांक-संसआसे/उसआसे नाशिक/अस्थाई पदे/न.क्र.७१९/कक्ष-५२/४४७-४९/२५, दि.२८.०३.२०२५**

**<u>प्रस्तावना: -</u>**

उपरोक्त संदर्भाधीन अ.क्र. २ येथील शासन निर्णयान्वये स्त्री रुग्णालय, धडगाव जि. नंदुरबार येथील ४३ अस्थायी पदांना दि.०१.०९.२०२४ ते दि.२८.०२.२०२५ पर्यंत पुढे चालू ठेवण्यास देण्यात आलेली मुदतवाढ संपुष्टात आल्याने सदर पदांना पुढे चालू ठेवण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय:-</u>**

या शासन निर्णयासोबत जोडलेल्या “परिशिष्ट-अ” मध्ये नमूद केलेल्या स्त्री रुग्णालय धडगाव जि. नंदुरबार येथील ४३ अस्थायी पदांना दि.०१.०३.२०२५ पासून दि.३१.०८.२०२५ पर्यंत पुढे चालू ठेवण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर पदांवरील खर्च खालील लेखाशिर्षातून खर्ची घालण्यात यावा आणि हा खर्च सन २०२५-२०२६ या वर्षाकरीता मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

**<u>मागणी क्रमांक-आर-१</u>**

“ २२१० - वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य
०१ - नागरी आरोग्य सेवा-विषम चिकित्सा
११० - रुग्णालये व दवाखाने
०६ - पंचवार्षिक योजनांतर्गत योजना-राज्य योजनांतर्गत योजना
(०६)(०१) - मुफसल क्षेत्रातील अध्यापनेतर शासकिय रुग्णालये व दवाखाने (अनिवार्य) (२२१० ०२२६)”

३. हा शासन निर्णय वित्त विभाग, शासन निर्णय क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि.०३.०३.२०२५ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४. वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक, पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि.०३.०३.२०२५ अन्वये दि.०१.०३.२०२५ ते दि.३१.०८.२०२५ पर्यंत अस्थाई पदांच्या मुदतवाढीस मान्यता देण्यात आली असली तरी, दरम्यानच्या काळात सुधारीत आकृतीबंधास उच्चस्तरीय सचिव समितीची मान्यता घेण्याबाबत सर्व प्रशासकीय विभागांनी तातडीने प्रस्ताव सादर करण्याबाबत वित्त विभागाने निर्देशित केले आहे. तसेच उपरोक्त संदर्भ क्र.०३ अन्वये वित्त विभागाच्या शासन निर्णयानुसार, अस्थायी पदांना दि.०१.०३.२०२५ ते दि.३१.०८.२०२५ पर्यंत मुदतवाढ देण्यात आली असून त्यादरम्यान सुधारीत आकृतीबंधास उच्चस्तरीय सचिव समितीची मान्यता घेण्याकरीता सुधारीत आकृतीबंधाचे प्रस्ताव शासन निर्णय, वित्त विभाग, दिनांक २९ जून,२०१७ नुसार तपासून व त्यानुसार कार्यवाही करुन तातडीने वित्त विभागास सादर करण्याकरीता आयुक्तालय कार्यालयाकडून उचित कार्यवाही करावी व त्याबाबातचा प्रस्ताव शासनास पाठवावा.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०४२८११०६२६१६१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SANJAY DATTARAM MAHADESHWAR

Digitally signed by SANJAY DATTARAM MAHADESHWAR
DN: cn=SANJAY DATTARAM MAHADESHWAR, o, ou, email=sanjay.mahadeshwar@nic.in, c=IN
Date: 2025.04.28 12:40:39 +05'30'

**(सं.द. महाडेश्वर)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. महालेखापाल,महाराष्ट्र-१/२ (लेखा परिक्षा) (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर.
२. संचालक-१, आरोग्य सेवा, मुंबई.
३. सहसंचालक, आरोग्य सेवा (रुग्णालये-राज्यस्तर), मुंबई.
४. सहसंचालक, आरोग्य सेवा (अर्थ व प्रशासन), मुंबई.

५. उपसंचालक, आरोग्य सेवा, नाशिक मंडळ, नाशिक.

६. जिल्हा शल्य चिकित्सक, नंदुरबार.

७. जिल्हा कोषागार अधिकारी, नंदुरबार.

८. वैद्यकीय अधिक्षक, स्त्री रुग्णालय धडगाव, जि.नंदुरबार

९. वित्त विभाग,(व्यय-१३) मंत्रालय,मुंबई.

१०.कार्यासन अधिकारी,सेवा-१सेवा-२/सेवा-३/सेवा-५/अर्थसंकल्प, सा.आ.वि. मंत्रालय, मुंबई यांना पुढील आवश्यक कार्यवाहीसाठी.

११.निवडनस्ती (आरोग्य-३)

## परिशिष्ट-अ

(शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांक- पीएचडी १६०२७/८५/२०२५ पीएचडी (आरोग्य-३) (ई.कॉम्प्युटर नं.१०७९०५४) दिनांक- २८ एप्रिल, २०२५ सोबतचे परिशिष्ट-अ)

| अ.क्र. | पदनाम | वेतन स्तर | अस्थायी पदे |
|---|---|---|---|
| १ | वैद्यकिय अधिक्षक वर्ग-१ | एस-२३ (६७७००-२०८७००) | १ |
| २ | वैद्यकिय अधिकारी प्रसवोत्तर (प्रसुती पश्चात) कार्यक्रम वर्ग-१ | एस-२३ (६७७००-२०८७००) | १ |
| ३ | बालरोग तज्ञ वर्ग-१ गट-अ | एस-२३ (६७७००-२०८७००) | १ |
| ४ | बधिरीकरण शास्त्रज्ञ वर्ग-१ गट-अ | एस-२३ (६७७००-२०८७००) | १ |
| ५ | क्ष-किरण शास्त्रज्ञ वर्ग-१ गट-अ | एस-२३ (६७७००-२०८७००) | १ |
| ६ | महाराष्ट्र वैद्यकिय व आरोग्य सेवा गट अ (बधिरीकरण शास्त्रज्ञ) | एस-२० (५६१००-१७७५००) | २ |
| ७ | महाराष्ट्र वैद्यकिय व आरोग्य सेवा गट अ (बालरोग तज्ञ) | एस-२० (५६१००-१७७५००) | २ |
| ८ | महाराष्ट्र वैद्यकिय व आरोग्य सेवा गट अ (स्त्री रोग प्रसुतीशास्त्र तज्ञ) | एस-२० (५६१००-१७७५००) | ४ |
| ९ | महाराष्ट्र वैद्यकिय व आरोग्य सेवा गट अ | एस-२० (५६१००-१७७५००) | ५ |
| १० | सहायक अधिसेविका | एस-१५ (४१८००-१३२३००) | १ |
| ११ | परिसेविका | एस-१४ (३८६००-११२८००) | ५ |
| १२ | अधिपरिचारिका | एस-१३ (३५४००-११२४००) | ८ |
| १३ | बालरोग परिचारिका | एस-१४ (३८६००-११२८००) | ३ |
| १४ | रक्तपेढी तंत्रज्ञ | एस-१३ (३५४००-११२४००) | १ |
| १५ | औषध निर्माता | एस-१० (२९२००-९२३००) | २ |
| १६ | भांडार तथा वस्त्रपाल | एस-६ (१९९००-६३२००) | १ |
| १७ | प्रशासकीय अधिकारी | एस-१५ (४१८००-१३२३००) | १ |
| १८ | अधिक्षक/लेखापाल/कारभारी | एस-१४ (३८६००-११२८००) | १ |
| १९ | वरिष्ठ लिपिक | एस-८ (२५५००-८११००) | १ |
| २० | कनिष्ठ लिपिक | एस-६ (१९९००-६३२००) | १ |
| **एकूण अस्थायी पदे** | | | **४३** |